पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवर शासन निर्णय दि. १४.०६.२००७ अन्वये निर्माण करण्यात आलेल्या " बॉम्ब शोधक व नाशक पथके " या मधिल मुंबई घटका करीता असलेली ४ पथके व ५६ पदे पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवर वर्ग करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय . अेपीओ - ३१०९/८०३/प्र.क्र.४०९/पोल-३
दिनांक :- ०८ सप्टेंबर, २०१०.

**संदर्भ :-**
१) शासन निर्णय गृह विभाग अेपीओ ३१०६/१२१४/प्र.क्र.२११/पोल ३. दि. १४ जून, २००७.
२) पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक पोमसं/२६ब/पदनिर्मिती/११०२१ दुसरा टप्पा/१०६/०७, दि. १४.०७.०९.
३) पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांचे पत्र क्रमांक पोआ/कक्ष-२(४) रवका/२९१/०९ दि. १७.०९.०९

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ १ येथील दि. १४ जून, २००७ च्या शासन निर्णयान्वये पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवर १२ बॉम्ब शोधक व नाशक पथके व विविध संवर्गातील एकूण १६८ पदे निर्माण करण्यात आली आहेत. त्यापैकी ४ बॉम्ब शोधक व नाशक पथके मुंबई घटका करीता आहेत व त्या करिता ५६ पदे निर्माण करण्यात आलेली आहे. सदर बॉम्ब शोधक व नाशक पथके व पदे ही बृहन्मुंबई करीता असल्यामुळे पोलीस महासंचालक व पोलीस आयूक्त बृहन्मुंबई यांनी सदर पथके व पदे पोलीस आयूक्त बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवर वर्ग करणेबाबत उपरोक्त संदर्भ क्र. २ व ३ अन्वये प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दि. १४ जून २००७ च्या शासन निर्णयान्वये पोलीस महासंचालक यांचे आस्थापनेवर मुंबई करीता निर्माण करण्यात आलेली ४ बॉम्बशोधक व नाशक पथके व त्या करीता निर्माण करण्यात आलेली ४ पोलीस उपनिरिक्षक, १२

पोलीस हवालदार व ४० पोलीस नाईक अशी एकुण ५६ पदे पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरुन " पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवर वर्ग करण्यात यावीत व त्यावरील आवर्ती व अनावर्ती खर्च लेखाशीर्ष-२०५५ पोलीस, (००) (१०१) गुन्हा अन्वेशण व दक्षता (००) (०१) गुन्हा अन्वेषण विभाग, बृहन्मुंबई (२०५५००३२)" या खाली टाकण्यात यावा.

२. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९०८१९४६३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नं.म.शिंदे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग,

प्रति - माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी

१) प्रधान महालेखाकार, (लेखा परिक्षा)- १ महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई./नागपूर.
३) मा. मंत्री (गृह) यांचे स्वीय सहायक.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नवी मुंबई, ठाणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे, जळगांव, गडचिरोली, गोंदिया.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) गृह विभाग पोल-४, पोल-५ अ, पोल-७, पोल-५ बीयूडी-१
९) निवड नस्ती, पोल ३